लातूर जिल्हयातील अनियमित तुकडयांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२०१७/(३४)/एसएम-५**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ४ जुलै, २०१७

वाचा :-

१. दिनांक २४ नोव्हेंबर, २००१ च्या मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णय,
२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : माशाअ-२००९/(५९९/०९) /माशि-१, दिनांक २० जुलै, २००९,
३. " महाराष्ट्र स्वंयअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन),२०१२ ",
४. शासननिर्णय , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. प्राशातु-२०१४/(२१२/२०१४/एसएम-४ दिनांक २ डिसेंबर, २०१४,
५. शासनपत्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. प्राशातु-२०१४/(२१२/२०१४/एसएम-४ दिनांक ४ डिसेंबर, २०१४,
६. शासन निर्णय , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.एसएसएन-२०१५/प्र.क्र.१६/ १५/टिएनटी-२, दिनांक २८ ऑगस्ट, २०१५,
७. शासन निर्णय , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.ईडीई-२११६/प्र.क्र.२०/ एसएम-२, दिनांक २ मार्च, २०१७.
८. मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथील रिट पिटीशन क्र.७६२/२०१५ मधील दिनांक ५ मे, २०१७ रोजीचा निर्णय,
९. शासन परिपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.११६/एसएम-४, दिनांक २० जून,२०१७.

**प्रस्तावना** :-

लातूर जिल्हयातील खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणा-या मान्यताप्राप्त प्राथमिक शाळांमधील १९९५ पासून बंद पडलेल्या तुकडयांचे तत्कालिन शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, लातूर यांनी खाजगी संस्थांच्या शाळांना नियमबाहयरित्या अवैध वाटप केल्याची बाब निदर्शनास आली होती. त्या संदर्भात विधान मंडळामध्ये तारांकित प्रश्न व लक्षवेधी सूचना उपस्थित करण्यात आल्या होत्या. तसेच, विविध संघटनांकडून तक्रारी सुध्दा प्राप्त झाल्या होत्या. सदर तक्रारींच्या अनुषंगाने शिक्षण संचालक (प्राथमिक) यांनी त्यांच्या दिनांक १४ ऑगस्ट, २०१२ च्या आदेशान्वये सदर प्रकरणाची चौकशी करण्याकरीता श्री.एस.के.घोनमोडे, तत्कालीन विभागीय अध्यक्ष, लातूर विभागीय मंडळ, लातूर यांच्या अध्यक्षतेखाली त्रिसदस्यीय समिती गठीत केली होती.

२. घोनमोडे समितीचा अहवाल व यासंदर्भातील सर्व कागदपत्रांची तपासणी केल्यानंतर प्रस्तृत प्रकरणी खालील गंभीर अनियमितता झाल्याचे स्पष्ट झाले :-

**(२.१)** तत्कालिन शिक्षणाधिकारी (प्राथमिक) जि.प.लातूर यांनी त्यांना अधिकार नसतांना बंद पडलेल्या व व्यपगत झालेल्या तुकडयांचे समायोजन केलेले आहे. सदरचे समायोजन हे दिनांक ६ डिसेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये ठरवून दिलेल्या पध्दतीचे उल्लंघन करणारे आहे. ही त्यांची कृती बेकायदेशीर व अनियमित स्वरुपाची ठरते.

**(२.२)** तुकडयांचे समायोजन करतांना विनाअनुदानित शाळांना अनुदानित शाळांच्या बंद पडलेल्या तुकडया समायोजनाद्वारे मंजूर करण्यात आल्या.

**(२.३)** व्यपगत झालेली एकच तुकडी एकापेक्षा अनेक शाळांना बेकायदेशीररित्या समायोजनाने मंजूर केली आहे.

**(२.४)** वैयक्तिक मान्यता देतांना सांविधानिक आरक्षणाचा विचार न करता व महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी सेवेच्या शर्ती नियमावली १९८१ मधील नियम ९ मधील कार्यपध्दतीचा अवलंब न करता देण्यात आलेल्या आहेत. ही कृती अत्यंत गंभीर स्वरुपाची अनियमितता ठरते.

**(२.५)** शिक्षकांचे समायोजन करतांना पूर्वलक्षी प्रभावाने समायोजन करण्याचे आदेश काढण्यात आलेले आहेत व वैयक्तिक मान्यता देतांना भविष्यातील दिनांक नमूद करुन कायम सेवासातत्याबाबत आदेश निर्गमित केले आहेत. ही कृती गंभीर अनियमितता ठरते.

**(२.६)** दिनांक ६ डिसेंबर, २००७ च्या शासन निर्णयामधील आदेशानुसार ज्येष्ठतेनुसार शाळांच्या तुकडयांचे समायोजन करणे आवश्यक होते. तशी कार्यवाही केल्याचे निदर्शनास आले नाही.

**(२.७)** २३८ शिक्षक अतिरिक्त ठरले असतांना नवीन तुकडयांवर, नवीन शिक्षकांना वैयक्तिक मान्यता देण्यात आलेल्या आहेत व त्यामुळे शासनावर रुपये ४ कोटी ९८ लक्ष अतिरिक्त बोजा पडल्याचा निष्कर्ष समितीने काढला आहे. ही गंभीर वित्तीय अनियमितता ठरते.

३. वरील प्रमाणे प्रस्तुत प्रकरणी गंभीर प्रकारच्या अनियमितता झाल्याचे स्पष्ट झाले असून देखील शासनाने सहानुभूतीपूर्वक निर्णय घेऊन दिनांक २ डिसेंबर, २०१४ च्या शासन निर्णयानुसार १४७ तुकडयांना सन २०१३-१४ पासून विनाअनुदान तत्वावर परवानगी देण्याचा निर्णय घेतला. त्यानंतर संबंधितांनी सदर शासन निर्णयाला मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे याचिका क्र.७६२/२०१५ व इतर संलग्न याचिकांद्वारे आव्हान दिले.सदर

याचिकांवर मा.उच्च न्यायालयाने दिनांक ५ मे, २०१७ रोजी निर्णय देऊन सदर प्रकरणी शासनाने पुनर्विचार करुन निर्णय घ्यावा असे आदेश दिले.

४. येथे नमुद करण्यात येते की, राज्य शासनाची तत्कालीन आर्थिक स्थिती विचारात घेऊन, दिनांक २४ नोव्हेंबर, २००१ च्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये राज्यात नवीन प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना परवानगी देतांना "कायम विनाअनुदान" तत्वावर परवानगी देण्याचा निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार सन २००२ पासून राज्यात "कायम विनाअनुदान" तत्वावर शाळांना परवानगी देण्याचे धोरण सुरु झाले. याचा अर्थ नवीन शाळा, तुकडया व त्यावरील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांना देखील "कायम विनाअनुदान" तत्व लागू झाले. सदर शाळा भविष्यात कधीही शासनाकडे अनुदानाची मागणी करणार नाहीत अशा आशयाचे हमीपत्र लिहून घेऊनच सदर शाळांना परवानगी देण्यात आली होती.

५. सदर शाळांना अनुदान लागू करण्याची मागणी सर्व संबंधित घटकांकडून वारंवार शासनाकडे करण्यात येत होती. ही बाब विचारात घेऊन, शासन निर्णय दिनांक २० जुलै, २००९ अन्वये राज्यातील इंग्रजी माध्यम वगळता सुमारे २,००० प्राथमिक व २,००० माध्यमिक शाळांचा "कायम" शब्द वगळण्यात आला. तरी सुध्दा त्यापुढे विनाअनुदानित शाळा उघडण्याचा निर्णय घेण्यात आला नाही. त्यामुळे सन २००१ चा कायम विनाअनुदानित शाळा व तत्सम बाबींच्या निर्णयामध्ये कोणताही बदल झाला नाही. सन २००१ पासून विनाअनुदानित शाळा देण्याचे धोरण संपुष्टात आले आहे. मधल्या काळात बृहतआराखडा तयार करुन तेवढयाच शाळांपुरते विनाअनुदानित शाळा देण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला होता. तो निर्णय आता रद्द करण्यात आलेला आहे.

६. राज्यामध्ये दर्जेदार शिक्षण देण्यासाठी व शिक्षणाच्या सार्वत्रिकरणाकरीता कायम विना अनुदान तत्वावर नवीन प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना मान्यता देणे व विद्यमान शाळेचा दर्जावाढ करण्यासाठी "महाराष्ट्र स्वंयअर्थसहायित शाळा (स्थापना व विनियमन), २०१२ " हा अधिनियम दिनांक १९ जानेवारी, २०१३ पासून राज्यात अंमलात आला आहे.

७. दिनांक २० जुलै, २००९ ते दिनांक १९ जानेवारी, २०१३ या कालावधी दरम्यान मा. न्यायालयाच्या आदेशानुसार काही शाळांना विनाअनुदान तत्वावर परवानगी देण्यात आली असण्याची शक्यता आहे. अशा शाळांना विना अनुदान तत्वावरील शाळा समजण्यात याव्यात. या शिवाय काही शाळांना विनाअनुदानित तत्वावर परवानगी देण्यात आली असल्यास ही बाब शासनाच्या निदर्शनास आणण्यात यावी.

८. संचमान्यतेच्या संदर्भात शासन निर्णय दिनांक २८ ऑगस्ट, २०१५ नुसार तुकडी संकल्पना संपुष्टात आल्यामुळे ज्या वर्गामध्ये निकषापेक्षा अधिक विद्यार्थी आहेत तेथे जादा शिक्षक पद देण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. तसेच, अशा अतिरिक्त शिक्षकाने वर्ग

भरविण्याकरिता त्या शाळेने अतिरिक्त खोली बांधल्यानंतरच ते पद भरण्याची परवानगी देण्याची तरतूद आहे. पुढील काळामध्ये इयत्ता १ ली ते ५ वी, इयत्ता ६ वी ते ८ वी व इयत्ता ९ वी ते १० वी च्या शाळांना नैसर्गिक वाढ राहणार नाही.

९. वरील वस्तुस्थिती व रिट पिटिशन क्र.७६२/२०१५ मध्ये मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने विनाअनुदानित शाळांबाबतचे शासनाचे धोरण स्पष्ट नसल्याचे नमूद केल्याने विनाअनुदान तत्व व स्वयंअर्थसहाय्यित तत्व इत्यादी संज्ञांचे स्पष्टीकरण शासन परिपत्रक दिनांक २० जून, २०१७ अन्वये खालीलप्रमाणे देण्यात आलेले आहे. :-

९.१ <u>**विना अनुदानित शाळा**</u> :- "कायम" शब्द वगळण्यात आलेल्या शाळा या आता विनाअनुदानित शाळा राहतील. शासन निर्णय दिनांक २० जुलै, २००९ अन्वये राज्यातील इंग्रजी माध्यम वगळता सुमारे २,००० प्राथमिक व २,००० माध्यमिक शाळांचा "कायम" शब्द वगळण्यात आला. काही प्रकरणात मा. न्यायालयाच्या आदेशानुसार विनाअनुदान तत्वावर परवानगी दिलेली असेल अशा शाळा विनाअनुदान तत्वावरील शाळा समजण्यात याव्यात या शिवाय काही शाळांना विनाअनुदानित तत्वावर परवानगी देण्यात आली असल्यास ही बाब शासनाच्या निदर्शनास आणण्यात यावी.

९. २ <u>**स्वयं अर्थसहाय्यित शाळा**</u> :- राज्यामध्ये दर्जेदार शिक्षण देण्यासाठी व शिक्षणाच्या सार्वत्रिकरणाकरीता "कायम विनाअनुदान" तत्वावर नवीन प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना मान्यता देणे व विद्यमान शाळेचा दर्जावाढ करण्यासाठी " महाराष्ट्र स्वंयअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन), २०१२ " हा अधिनियम दिनांक १९ जानेवारी, २०१३ पासून राज्यात अंमलात आला आहे. सदर अधिनियमानुसार ज्या शाळांना परवानगी देण्यात आलेली आहे त्या शाळांना भविष्यात केंव्हाही अनुदान अनुज्ञेय राहणार नाही. दिनांक २० जुलै, २००९ च्या शासन निर्णयामध्ये इंग्रजी माध्यम वगळून अन्य माध्यमांच्या शाळांचा "कायम" शब्द वगळण्यात आला होता. तथापि, महाराष्ट्र स्वंयअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन), २०१२ " हा अधिनियम दिनांक १९ जानेवारी, २०१३ पासून अमंलात आल्यामुळे या सर्व इंग्रजी माध्यमाच्या शाळा स्वंयअर्थसहाय्यित शाळा समजण्यात याव्यात. त्यानुसार यु-डायस मध्ये तशा प्रकारची नोंद घेण्यात यावी.

**१०.** बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम २००९ मधील तरतूदीनुसार ६ ते १४ वयोगटातील बालकांना मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार प्राप्त झाला. त्यानुसार शासनाने स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांव्दारे ६ ते १४ वर्ष वयोगटातील बालकांना मोफत शिक्षणाची संधी उपलब्ध करुन दिलेली आहे. त्यामुळे विद्यार्थ्यांनी खाजगी शाळांमध्ये प्रवेश न घेता स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांमध्ये प्रवेश घेऊन शिक्षण घेणे आवश्यक आहे. विद्यार्थ्यांच्या संख्येच्या प्रमाणात स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळा उपलब्ध आहेत. ज्या ठिकाणी शाळा उपलब्ध नसतील त्या ठिकाणी "सरल" प्रणालीनुसार तपासून शाळा सुरु करण्यात येतील. बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम २००९ मधील

तरतूदीनुसार ६ ते १४ वर्ष वयोगटातील कोणतेही बालक शिक्षणापासून वंचित राहणार नाही याबाबत शासन दक्षता घेत आहे.

वरील सर्व वस्तुस्थिती व मा. उच्च न्यायालयाने सदर प्रकरणी दिनांक ५ मे, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने लातूर जिल्हयातील अनियमित तुकडयांबाबत फेरनिर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** शासनाचे अस्तित्वात असलेले धोरण व मा. उच्च न्यायालयाने सदर प्रकरणी दिनांक ५ मे, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने पुनर्विचार करुन शासन निर्णय दिनांक २ डिसेंबर, २०१४ व दिनांक ४ डिसेंबर, २०१४ च्या शासन पत्रान्वये लातूर जिल्हयातील अनियमित तुकडयांना विनाअनुदान तत्वावर देण्यात आलेली परवानगी रद्द करण्यात येऊन खालील प्रमाणे सुधारीत निर्णय घेण्यात येत आहे:-

**(अ)** " लातूर जिल्हयातील अनियमित तुकडयांना व पदांना सन २०११-१२, सन २०१२-१३ पासून विनाअनुदान तत्वावर परवानगी देता येणार नाही."

**(ब)** " दि.२/१२/२०१४ च्या शासन निर्णयामधील अनुक्रमांक ३ मध्ये सुधारणा करुन प्रस्तुत प्रकरणातील १४७ तुकडयांना सन २०१३-१४ पासून स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर परवानगी देण्यात यावी. सदर तुकडयांवर कार्यरत शिक्षकांना भविष्यात शासनाकडून कोणतेही अनुदान अनुज्ञेय राहणार नाही."

**(क)** " तसेच, दि. ४/१२/२०१४ च्या शासन पत्रामध्ये सुधारणा करुन १४ शाळांमधील तुकडयांबाबत दि. ३०/९/२०१४ ची पटसंख्या विचारात घेऊन अनुज्ञेय होणा-या अतिरिक्त तुकडयांना सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षापासून स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर परवानगी देण्यात यावी. सदर तुकडयांवर कार्यरत शिक्षकांना भविष्यात शासनाकडून कोणतेही अनुदान अनुज्ञेय राहणार नाही. "

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०७०४१८०४५४६२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.07.04 18:04:54 +05'30'

**( नंदकुमार )**

प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्ष नेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ,सचिवालय,

२) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
३) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
४) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर,
६) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर,
७) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, लातूर,
८) उप सचिव (शिक्षक व शिक्षकेतर) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,
९) अवर सचिव (टीएनटी-२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,
१०) निवड नस्ती (एसएम-५), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय.